**राष्ट्रीय चक्रीवादळ धोके निवारण प्रकल्पांतर्गत**
**आचरा, जिल्हा सिंधुदूर्ग येथे बहुउद्देशीय**
**चक्रीवादळ निवारा केंद्र उभारण्याबाबत......**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग (मदत व पुनर्वसन)**
**शासन निर्णय क्र. आव्यप्र- २०१८/प्र.क्र.७६(२) /आव्यप्र-१**
मंत्रालय, मुंबई : ४०० ०३२.
दि. १९ डिसेंबर, २०१८

**प्रस्तावना :**

राष्ट्रीय चक्रीवादळ धोके निवारण प्रकल्प राज्याच्या रायगड, रत्नागिरी, सिंधुदुर्ग, पालघर, मुंबई शहर आणि मुंबई उपनगर या जिल्ह्यात राबविण्यात येत आहे. या प्रकल्पांतर्गत रत्नागिरी, रायगड, सिंधुदुर्ग आणि पालघर जिल्ह्यामध्ये बहुउद्देशीय चक्रीवादळ निवारा केंद्र उभारण्याचे प्रस्तावित आहे.

सार्वजनिक बांधकाम विभागाव्दारे वरील कामे करण्यात येणार आहेत. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, यांनी या संदर्भात सादर केलेल्या सैतवडे, जिल्हा रत्नागिरी येथे बहुउद्देशीय चक्रीवादळ निवारा केंद्र तपशीलवार प्रकल्प अहवलास (Detailed Project Report) जागतिक बँकेची मान्यता प्राप्त झाली आहे. (शासन निर्णय क्र.आव्यप्र-२०१७/प्र.क्र.११४/आव्यप्र-१/ संगणक सांकेतांक क्र. २०१८०७२७१५४१३३८६१९) सदर मान्यता प्राप्त तपशीलवार प्रकल्प अहवालास (DPR) अनुसरून आचरा ता. मालवण जि. सिंधुदूर्ग येथील प्रस्तावित बहुउद्देशीय चक्रीवादळ निवारा केंद्रासाठी आवश्यक तपशीलवार प्रकल्प अहवाल (DPR) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग यांचे कडून तयार करण्यात आला असून त्यास प्रशासकीय मान्यता व पुढील निविदा प्रक्रीयेस परवानगी देण्याची बाब शासनाच्या विचारधीन होती.

**शासन निर्णय :**

जागतिक बँक सहाय्यित राष्ट्रीय चक्रीवादळ निवारा केंद्र उभारण्याकरिता आचरा जि. सिंधुदूर्ग येथील निवारा केंद्राकरिता मुख्य अभियंता (विषेश प्रकल्प) सार्वजनिक बांधकाम विभाग यांनी राज्य दर-सूचीवर आधारित सादर केलेल्या रु. २,६०,६६,१३०.५५/- (रुपये दोन कोटी साठ लाख सहासष्ठ हजार एकशे तीस रुपये पंचावन्न पैसे फक्त) च्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता व पुढील निविदा प्रक्रीयेस शासन मान्यता देण्यात येत आहे.

१) सदर मान्यता शासन निर्णय वित्त विभाग क्रमांक - विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग- २ दिनांक १७ एप्रिल २०१५ मधील वित्तीय अधिकार नियमपुस्तिका, १९७८ भाग -पहिला, उपविभाग -५ अनुक्रमांक १, परिच्छेद क्रमांक १३४ अन्वये प्रदान केलेल्या वित्तीय अधिकारानूसार मंजूर करण्यात येत आहे.

२) या कामी होणारा खर्च राष्ट्रीय चक्रीवादळ धोके निवारण प्रकल्पातील कंपोनंट बी करीता केंद्र शासन आणि राज्य शासन यांच्याकडून अनुक्रमे ७५ टक्के आणि २५ टक्के या प्रमाणे करण्यात येईल.

३) आचरा, जिल्हा सिंधुदूर्ग येथे बहुउद्देशीय निवारा केंद्र उभारण्याचे काम कार्यादेश प्रदान केल्यापासून १८ महिन्यात पूर्ण करण्यात यावे.

४) या कामी होणारा खर्च मागणी क्रमांक सी-६, २२४५ नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी सहाय्य ८०, सर्वसाधारण, १०२ आपत्तीप्रवण क्षेत्रामध्ये नैसर्गिक आपत्कालीन परिस्थितीबाबतच्या तातडीच्या योजनांचे व्यवस्थापन करणे (०६) चक्रीवादळ रोधक बांधकाम करणे(०६)(०१) चक्रीवादळ रोधक बांधकाम करणे(७५ टक्के केंद्र हिस्सा ) (कार्यक्रम) (२२४५ २६०३) आणि मागणी क्रमांक सी -६ , २२४५ नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी सहाय्य ८० सर्वसाधारण १०२ आपत्तीप्रवण क्षेत्रामध्ये नैसर्गिक आपत्कालिन परिस्थितीबाबतच्या तातडीच्या योजनांचे व्यवस्थापन करणे (०६) चक्रीवादळ रोधक बांधकाम करणे (०६) (०२) चक्रीवादळ रोधक बांधकाम करणे (२५ टक्के राज्य हिस्सा) (कार्यक्रम) (२२४५ २६३२) या लेखाशिर्षातंर्गत असलेल्या तरतुदीतून करण्यात येईल.

५) सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०१८१२२०१४४५४०१११९ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shrirang Shripati Gholap

Digitally signed by Shrirang Shripati Gholap
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=DMU/R AND R, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e1b6e289fe7dcde27c972916398d8220a134ed8ebf6439e54d1927c5c4b28bec, cn=Shrirang Shripati Gholap
Date: 2018.12.20 14:53:29 +05'30'

**( श्रीरंग घोलप )**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.

२) प्रधान सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.

३) प्रधान सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.

४) प्रधान सचिव, ऊर्जा विभाग, मंत्रालय, मुंबई

५) मुख्य अभियंता, (विशेष प्रकल्प) सार्वजनिक बांधकाम विभाग, बांधकाम भवन, फोर्ट, मुंबई.

६) विभागीय आयुक्त, कोकण विभाग, कोकण भवन, बेलापूर, नवी मुंबई.

७) वित्तीय सल्लगार व सह सचिव, आपत्ती व्यवस्थापन प्रभाग, मंत्रालय, मुंबई.

८) आव्यप्र-१, संग्रहार्थ.